**श्री.नवनाथ काकासाहेब केंद्रे, नगरपरिषद अभियांत्रिकी सेवा (स्थापत्य) श्रेणी-अ यांची "शहर अभियंता" लातूर शहर महानगरपालिका येथे प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- लामपा-२०२२/प्र.क्र.१९/नवि-२४**
४ था मजला (मुख्य इमारत), मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
राजगुरू हुतात्मा चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :-२९ मार्च, २०२२

वाचा:- नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. नपप्रसं-३ संवर्ग/प्रतिनियुक्ती/ प्र.क्र.४०१ /२०२१/कक्ष-३/, दिनांक २७.१.२०२२.

**प्रस्तावना:-**

लातूर शहर महानगरपालिकेकरीता एकूण १२४६ पदांचा आकृतीबंध दिनांक २८.५.२०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आला आहे. सेवाप्रवेश नियमानुसार "शहर अभियंता" हे पद १०० टक्के पदोन्नतीचे असून योग्य अधिकारी उपलब्ध होईपर्यंत प्रतिनियुक्तीने भरण्याची तरतूद उपलब्ध आहे.

०२. श्री.नवनाथ काकासाहेब केंद्रे, नगरपरिषद अभियांत्रिकी सेवा (स्थापत्य) श्रेणी-अ या संवर्गातील अधिकारी असून त्यांची नगरपरिषद प्रशासन शाखा, जिल्हाधिकारी कार्यालय, परभणी येथे दिनांक १२.१.२०२२ रोजीच्या आदेशान्वये प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आलेली आहे. श्री. केंद्रे यांच्या विनंतीनुसार लातूर शहर महानगरपालिकेत "शहर अभियंता" या पदावर प्रतिनियुक्तीने पदस्थापना देण्यास आयुक्त तथा संचालक नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांनी संदर्भाधिन दिनांक २७.१.२०२२ रोजीच्या पत्रान्वये शिफारस केली आहे.

०३. श्री.नवनाथ काकासाहेब केंद्रे यांची विनंती तसेच आयुक्त तथा नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांच्याकडून प्राप्त शिफारशीनुसार श्री. केंद्रे यांची लातूर शहर महानगरपालिकेतील "शहर अभियंता" या रिक्त पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

लातूर शहर महानगरपालिकेतील रिक्त असलेल्या "शहर अभियंता" या पदावर श्री.नवनाथ काकासाहेब केंद्रे, नगरपरिषद अभियांत्रिकी सेवा (स्थापत्य) श्रेणी-अ यांची प्रथमत: एक वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

०२. श्री. केंद्रे, यांची सदर नियुक्ती ही महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयत्तोर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या परिशिष्ट-२ मध्ये विहीत करण्यात आल्यानुसार प्रतिनियुक्तीच्या पदाचा कार्यभार स्विकारल्यापासून एक वर्षाच्या कालावधीसाठी खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे:-

(अ) लातूर शहर महानगरपालिकेतील "शहर अभियंता" ह्या रिक्त पदावर श्री.केंद्रे यांची प्रतिनियुक्ती जो पर्यंत पदोन्नतीने अधिकारी उपलब्ध होत नाही, तो पर्यंत असेल.

(ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टिने शासनास आवश्यक वाटली, तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/ सक्षम प्राधिकारी राखून ठेवील.

(क) जर त्यांची सेवा स्वीयेतर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही, तर त्यांना मूळ विभागाकडे पाठविण्याची मुभा स्वीयेतर नियोक्त्याला राहील, मात्र, त्याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेतर नियोक्त्याने शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्याची नोटीस दिली पाहिजे.

(ड) त्यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा उद्देश आहे, अशी कमीत कमी ३ महिन्यांची लेखी नोटीस शासनाला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याबाबत शासन मान्यतेनंतर मुभा राहिल.

(इ) श्री. केंद्रे यांना या आदेशानुसार प्रतिनियुक्तीने नियुक्त केलेल्या काळातील प्रदाने नियमानुसार लागू राहतील.

०३. श्री.नवनाथ काकासाहेब केंद्रे यांनी प्रतिनियुक्तीच्या पदी तात्काळ रुजु व्हावे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२२०३२९१३३०१२८०२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Vidya Ramappa Hampayya
Date: 2022.03.29 13:33:02 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत तातडीच्या आवश्यक कार्यवाहीसाठी,**

१. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई.
२. श्री.नवनाथ काकासाहेब केंद्रे, द्वारे आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई.

**प्रति,**

१) मा.मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) आयुक्त, लातूर शहर महानगरपालिका, लातूर.
३) उप सचिव (नवि-१४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
५) निवड नस्ती, नवि-२४.